# मिस नेल्सन गायब आहेत!



हैरी अलार्ड

चित्र: जेम्स मार्शल, मराठी: सुजाता सावळे

# मिस नेल्सन गायब आहेत!

हैरी अलार्ड

चित्र: जेम्स मार्शल

मराठी: सुजाता सावळे





२०७ नंबरच्या वर्गातील मुले पुन्हा चुकीचे वागत होती.

थुंकीचे गोळे  छतावर चिकटले  होते.

कागदी विमानं हवेत उडत होती.

अख्ख्या शाळेत तो सर्वात दंगेखोर वर्ग होता.



“आता शांत व्हा”, मिस नेल्सन गोड आवाजात म्हणाल्या.



पण वर्ग शांत झाला नाही.



मुले  कुजबुजली आणि हसली.



ती वेडीवाकडी तोंडं करत चुळबुळत राहिली.

गोष्ट सांगत असतानाही ती उद्‌धटपणे वागत होती.




आणि धडा शिकायलाही ती नकार देत होती.



“ मला काहीतरी केलंच पाहिजे ”, मिस नेल्सन म्हणाल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी मिस नेल्सन शाळेत आल्या नाहीत.

“वॉव!” मुले ओरडली. “आता आम्ही दिवसभर मस्ती करू शकतो !”

त्यांनी छतावर आणखी थुंकीचे गोळे उडवले आणि कागदी विमानं उडवली.

“आज आम्ही दिवसभर दंगामस्ती करणार!” ते म्हणाले.

“इतकी घाई नको!”  एका अप्रिय आवाजात कोणीतरी पुटपुटले.











एक कुरूप काळा ड्रेस घातलेली बाई त्यांच्यासमोर येऊन उभी राहिली.

“मी तुमची नवीन शिक्षिका आहे, मिस वियोला स्वॅम्प”.

आणि तिने आपली छडी डेस्कवर आपटली.

“मिस नेल्सन कुठे आहेत?” मुले म्हणाली.

“आता तिचा विचार करू नका!” मिस स्वॅम्प चिडून म्हणाली.

“अंकगणिताची पुस्तके उघडा!”

मिस नेल्सनच्या मुलांनी स्वॅम्पच्या आदेशाप्रमाणे कृती केली.



ते बघत होते की मिस स्वॅम्प खरोखरच एक चेटकीण होती.



तिला चांगलं माहीत होतं.



त्यांना कामाला कसं
लावायचं .




आणि तिने त्यांना खूप सारा गृहपाठ दिला.



“आज आपण गोष्टीमध्ये वेळ घालवणार नाही”, मिस स्वॅम्प म्हणाली.

“तुमची तोंडं बंद ठेवा”, स्वॅम्पने सांगितले.

“एकदम शांत बसा”, ती ओरडली.

“आणि जर तुम्ही मस्ती केली तर तुम्हाला पश्चात्ताप होईल”, तिने बजावले.

२०७ नंबरच्या वर्गातील मुलांनी इतकी मेहनत कधीही केली नव्हती.



दिवस जात होते आणि मिस नेल्सनचा काही पत्ता लागत नव्हता.

मुलांना मिस नेल्सनची सारखी आठवण येत होती.

“आपल्याला मिस नेल्सनना शोधायलाच हवं”. ते म्हणाले.

त्यांच्यातले काही जण पोलिसांकडे गेले.

गुप्तहेर  मॅकस्मोगवर या केसची जबाबदारी सोपवण्यात आली.

त्याने मुलांकडून त्यांची गोष्ट ऐकून घेतली.

त्याने आपली हनुवटी खाजवली.  “हं” ते म्हणाले.

“मला वाटते मिस नेल्सन गायब आहेत.”

गुप्तहेर  मॅकस्मोग फार काही

मदत करू शकले नाहीत.



बाकीची काही मुले मिस नेल्सनच्या घरी गेली. घराचे पडदे घट्ट ओढून घेतलेले होते, कोणीही दरवाजा पण उघडला नाही. प्रत्यक्षात मुलांना फक्त दुष्ट मिस वियोला स्वॅम्प रस्त्यावरून येताना दिसली.

“जर तिने आपल्याला बघितलं तर ती आपल्याला आणखी गृहपाठ देईल.”

त्यामुळे मुले ताबडतोब तिथून पळून गेली.






कदाचित मिस नेल्सनच्या बाबतीत काहीतरी भयानक घडलं असावं!

“कदाचित एखाद्या शार्कने त्यांना गिळून टाकलं असेल?” त्यांच्यातला एक मुलगा म्हणाला.

पण तसं होण्याची अजिबात शक्यता नव्हती.

शार्क
( खूपच भयानक )



“मिस नेल्सन कदाचित मंगळावर गेल्या असतील!”

दुसरा एक मुलगा म्हणाला.

पण तशीही शक्यता वाटत नव्हती.



“मला माहीत आहे!” एक माहीतगार मुलगा म्हणाला.

“कदाचित मिस नेल्सनच्या कारला रागीट फुलपाखराची  झुंड उडत घेऊन गेली असेल!”

पण असे होण्याची शक्यता सगळ्यात कमी वाटत होती.



२०७ नंबर खोलीतील मुले खूप निराश झाली.

आता असे वाटतेय की मिस नेल्सन कधीच परत येणार नाहीत.

आणि आता त्यांना मिस वियोला स्वॅम्प बरोबरच राहावं लागेल.

त्यांना हॉलमधून पावलांचा आवाज ऐकू आला.

“ती चेटकीण येत आहे”, मुलं कुजबुजली.

“हॅलो,  मुलांनो!” कोणीतरी गोड आवाजात म्हटले.








त्या मिस नेल्सनच होत्या!

“तुम्हाला माझी आठवण आली?” त्यांनी विचारले.

“आम्हाला खूप आठवण येत होती!” मुलं ओरडली.

“तुम्ही कुठे होता?”

“ते कायम एक गुपित राहील,” मिस नेल्सन म्हणाल्या.

“आपण गोष्टीचा तास सुरु करूया?”

“हो ...” सगळी मुले ओरडली.

मिस नेल्सनना जाणवले की गोष्ट ऐकताना एकही मुलगा विचित्र वागत नव्हता.

“तुमच्या वागण्यात हा छान बदल कशामुळे झाला?” मिस नेल्सनने विचारलं.

“ते आमचं गुपित असेल,” मुलं म्हणाली.











घरी आल्यावर मिस नेल्सनने आपला कोट काढला आणि कपाटात अडकवला (एका कुरूप काळ्या ड्रेसजवळ).

झोपायच्यावेळी त्यांनी एक छोटं गाणं म्हटलं.

“मी त्यांना कधीच सांगणार नाही” हसत स्वतःशीच म्हणाल्या.





पी. एस. गुप्तहेर मॅकस्मोग एका नवीन केसवर काम करत आहेत.

ते आता मिस वियोला स्वॅम्पचा शोध घेत आहेत.

